मौजे लेन्ड्रा जि.नागपूर येथील कृषि महाविद्यालय, नागपूर यांचे ताब्यातील जमिन शहर बस वाहतूक स्थळाकरीता महानगरपालिका, नागपूर यांना हस्तांतरित करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : पंदेवि-१३१६/प्र.क्र.११४ भाग-१/७ अे
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ३१/०१/२०१७.

संदर्भ:- १) पदुम विभागाचे क्र.शिकाना -२०१६/प्र.क्र.०६/पदुम-४ दि.१५/१२/२०१६ चे पत्र
२) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांचे क्र.साप्रवि/ जमीन/ २८७३/२०१६ दि.१६/१२/२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना :**

दि.१५ डिसेंबर, २०१६ रोजी मा.मुख्यसचिव, महाराष्ट्र शासन यांचे अध्यक्षतेखाली नागपूर शहर विकास आराखडयात “सिटी ट्रान्सपोर्ट स्टॅन्ड” या आरक्षणाखाली असलेल्या जमिनी उपलब्ध करुन देण्याबाबत नागपूर येथे बैठक घेण्यात आली. पशुसंवर्धन विभागाच्या ताब्यातील जमिन “सिटी ट्रान्सपोर्ट स्टॅन्ड” करिता आरक्षित आहे. परंतु प्रस्तुत जागेत अतिशीत रेत प्रयोगशाळा, नागपूर या संस्थेमध्ये कृत्रीम रेतन कार्यासाठी आवश्यक असणाऱ्या वीर्यमात्रांचे उत्पादन करण्यात येत असल्यामुळे तेथे जागतीक पशुआरोग्य संस्थेच्या (ओआयई) जैवसुरक्षा बाबतच्या मार्गदर्शक सूचना लागू होतात. या कारणास्तव नमूद संस्थेची जैवसुरक्षा धोक्यात येऊ नये यासाठी पुढील प्रमाणे पर्याय उपलब्ध असल्याचे निर्दशनास आणुन देण्यात आला.

अ) मौजा पांढराबोडी, नागपूर, सर्व्हे नं.१/२ मधील पशुसंवर्धन विभागाच्या मागणी केलेल्या १.२ हे. जागे ऐवजी डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, कृषि वनशेती संशोधन प्रक्षेत्र, कृषि महाविद्यालय, नागपूर यांच्या ओल्ड फुटाळा फार्म येथील खसरा काचीमेट १७, १८ येथील जागेवर बस डेपो उभारण्यात यावा.

ब) तसेच, खसरा क्र. १७, १८ मधील अधीग्रहीत होणाऱ्या १.२ हे. जागेइतका भूखंड डॉ.पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत कृषि महाविद्यालयाच्या कृषि वनशेती संशोधन प्रक्षेत्र, कृषि महाविद्यालय, नागपूर, यांना कृषिवनशेतीसाठी पशुसंवर्धन विभागाने हस्तांतरीत करावा.

प्रस्तुत प्रस्तावास डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाने तत्वता: मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने पशुसंवर्धन विभागासोबत जागेची अदलाबदल करण्याची मागणी शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

पशुसंवर्धन विभागाच्या ताब्यातील मौजा पांढराबोडी, नागपूर, सर्व्हे नं.१/२ मधील मागणी केलेल्या १.२ हे. जागे ऐवजी डॉ.पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला यांच्या ताब्यातील कृषि वनशेती संशोधन प्रक्षेत्र, कृषि वनशेती संशोधन प्रक्षेत्र, कृषि महाविद्यालय, नागपूर, ओल्ड फुटाळा फार्म यांचे जागेवर खसरा काचीमेट १७, १८ येथील जागा सिटी ट्रान्सपोर्ट स्टॅडकरिता देऊन पशुसंवर्धन विभागाच्या ताब्यातील १.२ हे. जागेची अदलाबदल करण्यास कृषि विभागाची मान्यता देण्यात येत आहे.

२. नागपूर महानगरपालिकेने मौजा पांढराबोडी, नागपूर, सर्व्हे नं.१/२ मधील पशुसंवर्धन विभागाच्या मागणी केलेल्या १.२ हे. जागे ऐवजी डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, कृषि वनशेती संशोधन प्रक्षेत्र, कृषि महाविद्यालय, नागपूर यांच्या ओल्ड फुटाळा फार्म येथील खसरा काचीमेट १७, १८ येथील जागेवर बसडेपो उभारावा. याकरिता पशुसंवर्धन विभागाने आवश्यक ते आरक्षण बदलाची कार्यवाही नगरविकास विभाग यांचेकडून करावी.

३. खसरा क्र. १७, १८ मधील अधीग्रहीत होणाऱ्या १.२ हे. जागेइतका भूखंड डॉ.पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत कृषि महाविद्यालयाच्या कृषि वनशेती संशोधन प्रक्षेत्र, कृषि महाविद्यालय, नागपूर, यांना कृषिवनशेतीसाठी पशुसंवर्धन विभागाने हस्तांतरीत करावा. प्रस्तुत हस्तांतरणाची कार्यवाही पशुसंवर्धन विभागाने महसूल व वन विभागामार्फत तात्काळ करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१३११७१२४०४१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=AGRICULTURE AND ADF DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c08eef62183520696d2005b153b8cc2a552337a23fc4d457a4434216d9324c3b, serialNumber=6fd0ddfb9412fda09432e5f8a3e140c065770ba4ca63ef6fc5ba354810e2828b, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2017.01.31 17:14:50 +05'30'

**(क.य. वंजारे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
५. प्रधान सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, पदुम, मंत्रालय, मुंबई.
९. महासंचालक ,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे
१०.कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ , अकोला
११.निवडनस्ती कार्या.७- अे